**ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती संचलित शारदाबाई पवार महिला कला निकेतन, शारदानगर, ता.बारामती, जि.पुणे (अनुदानित) या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण कृषि उद्योग मूल शिक्षण संस्था, का-हाटी या संस्थेकडे करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. : एडीआर-२०२३/प्र क्र ६० / तांशि ६,**
मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग ,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई.४०००३२
दिनांक :- ०९ ऑगस्ट, २०२३

<u>संदर्भ</u> : १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शा.नि.क्र एईडी १४००/७३५४३(२२)/साशि ५, दिनांक १ जानेवारी, २००५
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शा.नि.क्र. एडीआर२०२१/प्र.क्र.६१/तांशि-६, दि. १२ डिसेंबर,२०२२.
३. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य क्र. डिओअे-२०२३ /दोन / १३५१,१५९५ व १९२४ दिनांक १२ मे,२०२३ , दि.१२ जून,२०२३ व दिनांक १७ जुलै,२०२३ ची पत्रे.

**<u>प्रस्तावना</u> :**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित, कायम विनाअनुदानित कला संस्थांचे व्यवस्थापन हस्तांतरण व व स्थलांतरण याकरिता संदर्भ क्र २ येथील दि. १२ डिसेंबर, २०२२च्या या शासन निर्णयान्वये कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. त्यास अनुसरून संचालक, कला संचालनालय यांनी संदर्भ क्र ३ येथील पत्रान्वये ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती संचलित शारदाबाई पवार महिला कला निकेतन, शारदानगर, ता.बारामती, जि.पुणे (अनुदानित) या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण कृषि उद्योग मूल शिक्षण संस्था, का-हाटी ता. बारामती, जि. पुणे या संस्थेकडे करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती संचलित शारदाबाई पवार महिला कला निकेतन, शारदानगर, ता.बारामती, जि.पुणे (अनुदानित) या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण कृषि उद्योग मूल शिक्षण संस्था, का-हाटी या संस्थेकडे करण्यास धर्मादाय आयुक्तानी मान्यता दिलेली आहे. निरीक्षक, चित्रकला व शिल्प,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण करण्याबाबतची कार्यवाही करण्याबाबत कळविले आहे. तसेच, टास्कफोर्स समितीने या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण करण्याची शिफारस केली आहे. संचालक, कला संचालनालय यांनी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ चे प्रथम सत्र माहे जून महिन्यात सुरू होत असल्याने ग्रामिण भागातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेवून प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती केली आहे. तसेच दि.१२ डिसेंबर,२०२३च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या कागदपत्रांची पुर्तता दोन्ही संस्थाकडून करण्यात आलेली आहे.

त्यास अनुसरून ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती संचलित शारदाबाई पवार महिला कला निकेतन, शारदानगर, ता.बारामती, जि.पुणे (अनुदानित) या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण कृषि उद्योग मूल शिक्षण संस्था, का-हाटी ता. बारामती, जि. पुणे या संस्थेकडे करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित, कायम विनाअनुदानित कला संस्थांचे व्यवस्थापन हस्तांतरण व व स्थलांतरणाकरिता दि. १२ डिसेंबर, २०२२च्या शासन निर्णयान्वये कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. यासाठी धर्मादाय आयुक्तांनी दिलेली मान्यता, निरिक्षक कार्यालयाचे अभिप्राय, टास्क फोर्स समितीची शिफारस व कला संचालनालयाने केलेली विनंती अनुसरून ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती संचलित शारदाबाई पवार महिला कला निकेतन, शारदानगर, ता.बारामती, जि.पुणे (अनुदानित) या कला संस्थेचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण कृषि उद्योग मूल शिक्षण संस्था, का-हाटी ता. बारामती, जि. पुणे या संस्थेकडे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. शारदाबाई पवार महिला कला निकेतन,बारामती, शारदानगर, पुणे अनुदानित कला संस्था सन २०२३-२४ पासून "शारदाबाई पवार कला महाविद्यालय" या नावाने चालविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०३. " शारदाबाई पवार कला महाविद्यालय" ही नियोजित कला संस्था मु.का-हाटी, ता.बारामती, जि.पुणे या ठिकाणी सन २०२३-२४ पासून चालविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०४. "शारदाबाई पवार कला महाविद्यालय" या नियोजित कला संस्थेत मुलभूत अभ्यासक्रम (१ वर्ष) व आर्ट टिचर डिप्लोमा (२ वर्षे) हे पदविका अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०५. शारदाबाई पवार महिला कलानिकेतन " या कला संस्थेतील संस्थेने कला संचालनालयाच्या मान्यतेने नियुक्त केलेल्या सर्व स्थायी/अस्थायी शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी त्यांच्या सेवाविषयक व शैक्षणिक तसेच इतर तदनुषंगिक बाबींसह "शारदाबाई पवार कला महाविद्यालय" या नियोजित कला संस्थेत सन २०२३-२४ पासून हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०६. "शारदाबाई पवार महिला कलानिकेतन, बारामती," या कला संस्थेस शासनाकडून मंजूर करण्यात येणारे सहायक अनुदान (वेतन) सन २०२३-२४ पासून "शारदाबाई पवार कला महाविद्यालय" या नियोजित कला संस्थेस मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. मात्र महाविद्यालयात विद्यार्थी संख्या कमी असल्यामुळे अनुदान चालू ठेवण्याबाबत संचालकांनी ठरलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे निर्णय घ्यावा.

०७. धर्मादाय आयुक्त यांनी दिनांक १३ जुलै,२०२३अन्वये दिलेल्या आदेशांचे पालन करण्यात यावे.

०८. संचालक, कला संचालनालय यांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ३० दिवसांच्या आत व्यवस्थापन बदलाबाबतचे आदेश निर्गमित करावेत.

०९. कृषी उद्योग मुल शिक्षण संस्था, मु.का-हाटी, ता.बारामती, जि.पुणे या संस्थेस ललित कलेचे वरील अभ्यासक्रम चालविताना खालील अटी शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

१)संबंधित पदविका अभ्यासक्रमासाठी प्रती विद्यार्थी शिक्षण शुल्क व इतर अनुषंगिक शुल्क शासन निर्णय क्र. दि.१.१.२०११ अन्वये विहित केल्याप्रमाणे असेल.

२)संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता एखाद्या शैक्षणिक वर्षामध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला असल्यास सतत २ वर्षे कला संस्थेची /अभ्यासक्रमाची /तुकडीची

तपासणी करुन सलग २ वर्षे मानकानुसार विद्यार्थी संख्येची अट पूर्ण न केल्यास तिस-या वर्षी कला संस्थेची/अभ्यासक्रमाची/तुकडीची मान्यता ठेवावी किंवा कसे? याबाबत कला संचालक, कला संचालनालयामार्फत अहवालासह शासनास प्रस्ताव सादर करण्यात येईल व त्यानुसार सदर कला संस्थेबाबतचा निर्णय शासन घेईल.

३)प्रत्येक विद्यार्थ्याची शैक्षणिक वर्षामध्ये किमान ७५% उपस्थिती असणे अनिवार्य राहील.

४)संबंधित पदविका अभ्यासक्रमाची तपासणी कला संचालनालयाच्या अखत्यारितील तज्ञ समितीकडून करण्यात येईल.

५)संबंधित पदविका अभ्यासक्रमाची सार्वजनिक परीक्षा कला संचालनालयाकडून घेण्यात येईल व उत्तीर्ण विद्यार्थ्यांना प्रमाणपत्रे देण्यात येतील.

६)संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या परीक्षेसाठी परीक्षा शुल्क, गुणपत्रिका शुल्क व प्रवेश शुल्क दि.२६.६.२०१२च्या शासन निर्णयान्वये विहित केल्यानुसार असेल.

७)संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात दि.१६.३.२०१६ (परिशिष्ट-अ) मधील शासन निर्णयातील तरतूदीनुसार यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, ग्रंथालयीन साधनसामुग्री व इतर तदनुषंगिक बाबी असणे अनिवार्य आहे.

८)संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता दि.१६.३.२०१६ (परिशिष्ट-अ) मधील शासन निर्णयाच्या तरतूदीनुसार वर्गखोली, इतर कक्ष व इतर तदनुषंगिक बाबी असणे अनिवार्य आहे.

९)विद्यार्थी व विद्यार्थीनींसाठी सर्व पायाभूत सुविधा तसेच स्वतंत्र स्वच्छतागृहाची सोय असणे अनिवार्य आहे.

१०)विद्यार्थ्यांकरिता पिण्याच्या पाण्याची व्यवस्था असणे अनिवार्य आहे.

११)संबंधित पदविका अभ्यासक्रम शिकविण्याकरिता शासन निर्णय क्र.एईडी-११६३-क्यू, दि.१४ ऑगस्ट,१९६८, शासन निर्णय क्र.एईडी-११७०/१०५५८९-क्यू, दि.७ डिसेंबर,१९७४ तसेच शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/ प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६.३.२०१६ (परिशिष्ट-अ) मधील तरतूदीनुसार व अनुदान संहितेमधील तरतूदीनुसार विहीत केलेल्या पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांची ठरीव प्रमाणानुसार नियुक्ती करणे अनिवार्य आहे.

१२)संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने संस्थेचे वित्तीय स्थैर्य आश्वासित आहे. या अटी/शर्तीच्या पुर्ततेसाठी संस्थेने राष्ट्रीयकृत बँकेत कला संचालक व संस्था चालक यांच्या संयुक्त खात्यात शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/ प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६.३.२०१६ (परिशिष्ट-अ) मधील तरतूदीनुसार ठेव जमा करणे अनिवार्य व बंधनकारक राहील व ही रक्कम संस्था चालकास कला संचालकांच्या मंजूरीशिवाय एकतर्फी उचल करता येणार नाही. तसेच कला संस्था/अभ्यासक्रम प्रत्यक्ष सुरु करण्यापूर्वी वित्तीय स्थैर्य ठेव पावती/ कागदपत्र संबंधित संस्थेने कला संचालनालयास सादर करणे बंधनकारक आहे.

१३)संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता नियुक्त करण्यात येणा-या कर्मचारी वर्गास शासनाने वेळोवेळी विहित केल्यानुसार वेतन/मानधन देणे अनिवार्य व बंधनकारक राहील. या प्रकरणी न्यायालयीन अथवा इतर कोणतेही पेचप्रसंग उदभवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्थेची/कला संस्थेची राहील.

१४)महाराष्ट्र शासन, कला संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई व निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून वेळोवेळी विहित केलेल्या तसेच वेळोवेळी विहित करण्यात येणा-या अटी व शर्ती कला संस्थेस बंधनकारक राहतील.

१५)शासनमान्य कला संस्था/अभ्यासक्रम कला संचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखाली राहतील. कला संस्था/अभ्यासक्रम याबाबत कोणत्याही बाबतीत तक्रारी प्राप्त

झाल्यास त्याची तपासणी करण्याचा अधिकार कला संचालकांचा राहील व त्याबाबतचा अहवाल कला संचालक शासनास सादर करतील आणि त्यानुषंगाने निर्णयाप्रत येण्याचा अधिकार शासनास असेल.

१६)संबंधित कला संस्थेस/अभ्यासक्रमास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेची मान्यता घेणे अनिवार्य राहील.

१७)संबंधित कला संस्था हस्तांतरीत केल्यानंतर सदर कला संस्थेतील कर्मचा-यांच्या सेवाविषयक बाबींसंदर्भात सर्व पत्रव्यवहार नवीन कला संस्थेकडून होणे अनिवार्य राहील.

१८) संबंधित कला संस्थेचे हस्तांतरण झाल्यानंतर शारदाबाई पवार महिला कला निकेतन या नावाचा वापर करता येणार नाही.

१९) संबंधित कला संस्थेचे हस्तांतरण झाल्यानंतर कार्यरत शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचा-यांची सेवा खंडीत करता येणार नाही.

२०) संबंधित संस्था हस्तांतरण झाल्यानंतर कार्यरत शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचा-यांचा सेवाविषयक अथवा न्यायालयीन पेचप्रसंग उद्भवल्यास यांची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०९१६१२३४१००८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

Digitally signed by HUSSEIN ALIMIYA MUKADAM
Date: 2023.08.09 16:14:39 +05'30'

**( हुसेन अ. मुकादम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल, लेखापरिक्षा महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी शारदाताई पवार महिला कला निकेतन शारदा नगर, ता. बारामती, जि. पुणे.
६. सचिव, कृषी उद्योग मुल शिक्षण संस्था, मु.का-हाटी, ता.बारामती, जि.पुणे
७. निवडनस्ती.